**शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई येथील शिक्षकीय पदे भरण्यासाठी निवड मंडळ गठीत करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
### शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१५/ (१०८/२०१५) मशि-१

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दि. २८ ऑगस्ट, २०१५.

वाचा :- १. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. ममअ-२०१४/शाविमम/प्रशा-१/१८८४ दि. २५/२/२०१५.
२. शासन अधिसूचना क्र. MPSC-१०१४/C.R.९०/१४/VIII दि.१२/०१/२०१५.

**प्रस्तावना :-**

शासन अधिसूचना क्र. MPSC-१०१४/C.R.९०/१४/VIII दि.१२/०१/२०१५ अन्वये शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई येथील शिक्षकीय पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतून वगळण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. यास्तव सदर महाविद्यालयातील पदे भरण्यासाठी निवड मंडळ गठीत करून सदर मंडळाची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून दिनांक २५.०२.२०१५ रोजीचा प्रस्ताव व शासन निर्णय क्र. स्थासस-२०१३/प्र.क्र.१२/१३/मशि-२, दिनांक ०३/७/२०१३ अन्वये शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई येथे गठीत करण्यात आलेल्या नियामक परिषदेच्या दिनांक १२/०६/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेला निर्णय विचारात घेऊन शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई येथील शिक्षकीय पदे भरण्यासाठी पुढील प्रमाणे निवड मंडळ गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**समितीची रचना :-**

| | | |
|---|---|---|
| १. | मा. महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २. | मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली किंवा उच्च न्यायालय खंडपीठ, मुंबई येथील सेवानिवृत्त न्यायाधीश | सदस्य |
| ३. | मा. उच्च न्यायालय मुंबई येथील ज्येष्ठ विधिज्ञ | सदस्य |
| ४. | विधी शिक्षण क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती | सदस्य |
| ५. | सहसंचालक, उच्च शिक्षण विभाग, मुंबई | सदस्य सचिव |

देशातील विद्यापीठीय शिक्षणाची गुणवत्ता राखण्यासाठी तसेच त्यावर संनियंत्रण करण्यासाठी संसदेने पारित केलेल्या अधिनियमाव्दारे विद्यापीठ अनुदान आयोगाची निर्मिती करण्यात आली असून विद्यापीठ अनुदान आयोगाने उच्च शिक्षणातील गुणवत्ता राखण्याच्या दृष्टीने तसेच विद्यापीठीय तसेच विद्यापीठांशी संलग्नित असलेल्या महाविद्यालयांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर अधिकारी/कर्मचारी यांच्या नियुक्तीसाठी किमान अर्हता विद्यापीठ अनुदान आयोगाकडून वेळोवेळी अधिसूचित करण्यात येतात. त्यानुसार विद्यापीठ अनुदान आयोगाने विहीत केलेल्या व राज्य शासनाने मान्यता दिलेल्या अर्हता, अनुभव व पात्रतेचे इतर निकष तसेच वेतनश्रेण्या निवड मंडळामार्फत नियुक्तीसाठी शिफारस करण्यात येणाऱ्या उमेदवारांना लागू राहतील.

निवड मंडळामार्फत नियुक्तीसाठी शिफारस करण्यात येणाऱ्या उमेदवारांना इतर शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील पदांना लागू असलेल्या सेवाशर्ती तसेच महाराष्ट्र नागरी सेवा नियम निवडसमितीकडून नियुक्तीसाठी शिफारस झालेल्या उमेदवारांनाही लागू राहतील.

शासकीय विधी महाविद्यालयातील शिक्षकीय पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवारांची नियुक्तीसाठी शिफारस करण्याकरीता जी कार्यपध्दती अवलंबण्यात येते त्याधर्तीवर अर्ज मागविणे, अर्ज सादर करण्याची मुदत, अर्जांची तपासणी, उमेदवारांच्या संख्येनुसार उमेदवारांची निवड ही मौखिक अथवा लेखी चाचणीव्दारे घेणे, निकाल जाहीर करणे यासारख्या बाबींच्या संदर्भात कार्यपध्दती निवड समिती निश्चित करेल.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०८२८१११४५३१७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Niwrutti B Marale
Date: 2015.08.28 15:30:08 +05'30'

**(नि. भा. मराळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
३. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. सर्व विभागीय शिक्षण सहसंचालक (उच्च शिक्षण)
५. प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती-मशि-१